**लेखाशिर्ष -८६७४ खालील प्रतिभूती ठेवी नशिराबाद सुनसगाव कुऱ्हा रा.मा.क्र. १९० वरील पुलाच्या जोडरस्त्याच्या कामाकरीता भूसंपादनाचा वाढीव मावेजा अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायप्र- २०२०/प्र.क्र. ४८/रस्ते-०७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - ०१.०३.२०२३

**वाचा:-** १. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. न्याखभ-२०१५/प्र.क्र.१९६/अर्थ-२, दि.१२.०८.२०१४ आणि क्र.न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दिनांक.३ जून २०१५
२. वित्त विभाग शासन निर्णय क्र: अर्थसं-२०२०/प्र.क्र. ६५/अर्थ-३, दिनांक १६ जून २०२०
३. वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व १४.१०.२०२१
४. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव यांचे दि.२५.११.२०२२ व दि.०३.०२.२०२३ चे पत्र

**प्रस्तावना :-**

नशिराबाद सुनसगाव कुऱ्हा रा.मा.क्र. १९० वरील पुलाच्या जोडरस्त्याच्या कामाकरीता भूसंपादनाचा वाढीव मावेजा अदा करण्याबाबत पिठासीन अधिकारी, भूमिसंपादन, पुर्नस्थापना आणि पुर्नवसन प्राधिकरण, नागपूर यांच्या दि.२६.११.२०२० रोजीच्या आदेशाच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याबाबत, मा. न्यायालयाने मूळ निवाड्याच्या रक्कमेवर ७५% रक्कम १२ आठवड्याच्या कालावधीत न्यायालयात भरण्याबाबत आदेशित केले आहे. त्यानुषंगाने प्राप्त संदर्भीय क्र.४ येथील प्रस्तावावर वित्त विभागाचे संदर्भिय शासन निर्णय / परिपत्रकामधील सूचना विचारात घेवून खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

नशिराबाद सुनसगाव कुऱ्हा रा.मा.क्र. १९० वरील पुलाच्या जोडरस्त्याच्या कामाकरीता भूसंपादनाचा वाढीव मावेजा अदा करण्याबाबत पिठासीन अधिकारी, भूमिसंपादन, पुर्नस्थापना आणि पुर्नवसन प्राधिकरण, नागपूर यांच्या दि.२६.११.२०२० रोजीच्या आदेशाच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याबाबत, मा. न्यायालयाने मूळ निवाड्याच्या रक्कमेवर ७५% रक्कम १२ आठवड्याच्या कालावधीत न्यायालयात भरण्याबाबत आदेशित केले आहे. त्यानुसार वाढीव मोबदला रक्कम रू. ११,०९,०९,८०९/- या रकमेच्या ७५% रूपये ८,३१,८२,३५१/- (अक्षरी रूपये आठ कोटी एकतीस लक्ष ब्याऐंशी हजार तीनशे एकावन्न फक्त) इतका निधी मा. न्यायालयामध्ये जमा करण्यासाठी याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगाव व विशेष भूसंपादन अधिकारी, जळगांव यांनी पुढील अटींची पुर्तता करण्याची दक्षता घ्यावी:-

अ) उपरोक्त रक्कम जमा करण्यासाठी झालेला विलंब क्षमार्पित करण्याची व त्यानुषंगाने ही रक्कम जमा करण्यासाठी मुदत वाढवून मिळण्याची विनंती मा. न्यायालयास करण्यात यावी.
ब) त्यानतंर सदरहू मंजुर झालेल्या रक्कमेचा तातडीने न्यायालयात भरणा करावा व चलनाचीप्रमाणित प्रत त्वरेने शासनास सादर करावी.
क) प्रस्तुत न्यायालयीन प्रकरणात मा. वरिष्ठ न्यायालयाचा अंतिम निर्णय लागल्याशिवाय किंवा वरिष्ठ न्यायालयाच्या निदेशाशिवाय तसेच राष्ट्रीयकृत बँकेच्या हमीशिवाय (राष्ट्रीयकृत बँकेची हमी उच्च

न्यायालयाच्या अंतिम निर्णयापर्यंत Valid असणे आवश्यक राहील.) संबंधितांना रक्कम वितरीत करण्यात येवू नये, अशी लेखी विनंती सरकारी वकीलांमार्फत न्यायालयास करण्यात यावी.

इ) या प्रकरणी कोणत्याही खातेदारास मा. न्यायालयामार्फत कोणत्याही बाबतीत दुहेरी फायदा होणार नाही याची उपविभागीय अधिकारी तथा भूसंपादन अधिकारी, जळगांव यांनी दक्षता घ्यावी.

ई) लेखाशिर्ष ८६७४ - शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी अंतर्गत येणाऱ्या न्यायालयाच्या किंवा न्यायाधिकरणाच्या न्यायनिर्णयाची, हुकुमनाम्याची किंवा निवाडयाची पूर्ती करण्याबाबत विभागाने दिनांक १२/०८/२०१४ व ३/०६/२०१५ रोजी परिपत्रके निर्गमित केली आहेत. त्यानुसार तसेच अशा प्रकरणी वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या परिपत्रक / शासन निर्णयान्वये दिलेल्या निदेशानुसार कार्यवाही करावी.

३. यावर होणारा खर्च हा " ८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी -१०१, शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी- (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रक्कमा (संगणक संकेतांक - ८६७४-००१९)" यालेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. उपरोक्त लेखाशिर्षाखाली देण्यात आलेली मंजूर रक्कम ही अंतीम आहे. त्यानुषंगाने

अ) जर वरिष्ठ न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या अपिलाचा अंतिम निकाल शासनाच्या बाजूने लागला तर या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम न्यायालयाकडून काढून त्या रकमेचा भरणा ८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१, शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी- (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रक्कमा (संगणक संकेतांक-८६७४-००१९)" या लेखाशिर्षाखाली करावा लागेल. मात्र

ब) जर वरिष्ठ न्यायालयाचा निकाल शासनाच्या विरुध्द बाजुने लागला तर सदरहू रक्कम उपरोक्त (अ) मधील लेखाशिर्षाखाली जमा दर्शवून, मागणी क्र. एच-७, मुख्य लेखाशिर्ष ५०५४, मार्ग व पुल यावरील भांडवली खर्च, (००)(०२) वनीकरण (५०५४ ०५८१) या लेखाशिर्षा अंतर्गत लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा लागणार आहे. त्या परिस्थितीमध्ये अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव हे आवश्यक त्या "भारीत निधी" मंजुरीबाबतचा सविस्तर प्रस्ताव विहीत मार्गाने शासनाच्या मान्यतेसाठी सादर करतील.

५. उपविभागीय अधिकारी तथा भूसंपादन अधिकारी, जळगांव यांनी मा. वरिष्ठ न्यायालयामधील अपिलाचा निकाल लागल्याबरोबर या प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी आणि केलेल्या कार्यवाहीचा अहवाल सार्वजनिक बांधकाम विभागाच्या यंत्रणेमार्फत शासनास सादर करावा.

६. प्रस्तुत आदेश संदर्भिय वित्त विभागाचे परिपत्रक / शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३०११७३२२३०२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRADEEP PUNAJI TIRLOTKAR

Digitally signed by PRADEEP PUNAJI TIRLOTKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ccd661813d437193c30b84b205e0a135838bd8252e5bad56d93fea8bfca55a9a, pseudonym=BDE95C233679ED9522D94A7AC04F7CE2EC7BC337, serialNumber=DB6B6957205113E4168ADAD8DB3AEB8B70CD1C42BD3EF06C1B5EB9D26A7BE37E, cn=PRADEEP PUNAJI TIRLOTKAR
Date: 2023.03.02 15:18:24 +05'30'

**( प्रदीप पुनाजी तिर्लोटकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक

२) जिल्हाधिकारी, जळगांव

३) अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,जळगांव
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,जळगांव
५) वित्त विभाग, (अर्थ-२ व ३), मंत्रालय, मुंबई
६) कार्यासन अधिकारी (अर्थ-१) ,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
८) निवडनस्ती- कार्यासन रस्ते-७.